**भारतीय प्रशासन सेवेतील अधिका-यांचे १ आठवड्याचे सेवांतर्गत प्रशिक्षण कार्यक्रम प्रशिक्षणासाठी जाताना करावयाची प्रशासकीय व्यवस्था**

# महाराष्ट्र शासन

## सामान्य प्रशासन विभाग

### शासन परिपत्रक क्रमांक : भाप्रसे १५१८/प्र.क्र.२११/२०१८/९

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २७ ऑगस्ट, २०१८

**वाचा -**

१) शासन परिपत्रक क्र.भाप्रसे १०१४/प्र.क्र.१८०/२०१४/९, दिनांक ०१.०८.२०१४
२) शासन परिपत्रक क्र.भाप्रसे १०१५/प्र.क्र.३२६/२०१५/९, दिनांक २१.११.२०१५
३) शासन परिपत्रक क्र.भाप्रसे १०१६/प्र.क्र.१९७/२०१६/९, दिनांक १०.१०.२०१६
४) शासन परिपत्रक क्र.भाप्रसे १०१७/प्र.क्र.१५०/२०१७/९, दिनांक १५.०७.२०१७

**शासन परिपत्रक -**

सन २०१८-१९ या वर्षासाठी १ आठवड्याचे सेवांतर्गत प्रशिक्षण कार्यक्रमाचे वेळापत्रक केंद्र शासनाच्या कार्मिक व प्रशिक्षण विभागाने दि.१६.०८.२०१८ रोजीच्या पत्रान्वये राज्य शासनास पाठविले असून प्रशिक्षण संस्था व कालावधी याचा तपशील कळविण्यात आला आहे. या प्रशिक्षण कार्यक्रमासाठी भाप्रसे अधिका-यांनी त्यांची इच्छुकता Intra IAS Portal मध्ये Online स्वरुपात सादर करण्याच्या सूचना केंद्र शासनाने दिलेल्या आहेत. सेवांतर्गत प्रशिक्षणाचे वेळापत्रक व त्यासंदर्भातील केंद्र शासनाच्या सूचना राज्यातील सर्व भाप्रसे अधिका-यांना दिनांक २१.०८.२०१८ रोजीच्या पृष्ठांकनान्वये कळविण्यात आलेल्या आहेत.

२. भारतीय प्रशासकीय सेवेतील अधिका-यांनी एका आठवड्याच्या सेवांतर्गत प्रशिक्षणासाठी त्यांची इच्छुकता Online स्वरुपात कार्मिक व प्रशिक्षण विभागास कळविल्यानंतर भाप्रसे अधिका-यांची नामनिर्देशने कार्मिक व प्रशिक्षण विभागाकडून अंतिम करण्यात येतात व त्यानंतर त्यांचेकडून संबंधित अधिका-यांना व प्रशिक्षण संस्थेस परस्पर पत्रे पाठविली जातात. एका आठवड्याच्या सेवांतर्गत प्रशिक्षणासाठी भाप्रसे अधिका-यांचे नामनिर्देशन केंद्र शासनाच्या कार्मिक व प्रशिक्षण विभागाकडून अंतिम केल्यानंतर त्यासंदर्भातील त्यांच्या पत्राची प्रत या विभागास प्राप्त होण्यास कांही कालावधी लागतो. परंतु संबंधित भाप्रसे अधिका-यांचे नामनिर्देशन अंतिम केल्याबाबतच्या पत्राची प्रत संबंधित अधिका-यांना केंद्र शासनाच्या कार्मिक व प्रशिक्षण विभागाकडून परस्पर ई-मेल/फॅक्सद्वारे तात्काळ पाठविली जाते. सदर प्रशिक्षणास उपस्थित राहण्याकरिता संबंधित भाप्रसे अधिकारी सामान्य प्रशासन विभागाकडून त्यांना प्रशिक्षण कार्यक्रमास उपस्थित राहण्यास परवानगी देण्याबाबतचे पत्र प्राप्त होण्याची प्रतिक्षा करतात. परंतु या विभागास अधिका-यांचे नामनिर्देशन अंतिम केल्याबाबतचे कार्मिक व प्रशिक्षण विभागाचे पत्र प्राप्त होण्यास विलंब लागत असल्यामुळे या विभागाकडून संबंधित अधिका-यांना कळविण्यास उशीर होतो.

३. सदर कालापव्यय कमी करण्यासाठी एका आठवड्याच्या सेवांतर्गत प्रशिक्षण कार्यक्रमास कार्मिक व प्रशिक्षण विभागाने भाप्रसे अधिका-यांचे नामनिर्देशन अंतिम केल्यानंतर प्रशिक्षणासाठी उपस्थित राहण्यासाठी जाताना प्रशासकीय व्यवस्था करण्यासंदर्भात खालील सुचना देण्यात येत आहेत,-

३.१) एका आठवड्याच्या सेवांतर्गत प्रशिक्षण कार्यक्रमासाठी भारतीय प्रशासन सेवेतील अधिका-यांचे नामनिर्देशन केंद्र शासनाच्या कार्मिक व प्रशिक्षण विभागाकडून अंतिम केल्यानंतर त्याची सुचना कार्मिक व प्रशिक्षण विभागाकडून संबंधित भाप्रसे अधिका-यांना व संबंधित प्रशिक्षण संस्थेस ई-मेल/फॅक्सद्वारे कळविली जाते.

३.२) एका आठवड्याच्या सेवांतर्गत प्रशिक्षणासाठी नामनिर्देशन अंतिम केल्याचे पत्र केंद्र शासनाच्या कार्मिक व प्रशिक्षण विभागाकडून संबंधित भाप्रसे अधिका-यांना प्राप्त झाल्यानंतर संबंधित अधिका-यांनी सामान्य प्रशासन विभागाकडून त्यांना कळविले जाण्याची प्रतिक्षा न करता, वरिष्ठ अधिका-यांच्या सल्ल्याने त्यांच्या प्रशिक्षणाच्या अनुपस्थितीच्या कालावधीतील प्रशासकीय व्यवस्था स्थानिक पातळीवरच करुन प्रशिक्षणासाठी कार्यमुक्त होऊन सेवांतर्गत प्रशिक्षणासाठी उपस्थित राहावे. त्याकरिता सामान्य प्रशासन विभागाच्या पत्राची प्रतिक्षा करणे अपेक्षित नाही. मात्र सदर प्रशिक्षण पूर्ण केल्यानंतर याबाबतची माहिती प्रशिक्षण पूर्ण केल्याच्या प्रमाणपत्रासह सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन ९/९अ/१०) यांना कळविण्यात यावी.

३.३) केवळ मंत्रालयीन प्रशासकीय विभागामध्ये अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव या पदावर कार्यरत असलेल्या भाप्रसे अधिका-यांचे एका आठवड्याच्या सेवांतर्गत प्रशिक्षणासाठी केंद्र शासनाच्या कार्मिक व प्रशिक्षण विभागाने नामनिर्देशन अंतिम केल्यानंतर त्याबाबतची माहिती सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन १० यांना त्वरित कळविण्यात यावी. अशा प्रशिक्षण कालावधीमध्ये सदर अधिकारी कार्यरत असलेल्या पदाचा अतिरिक्त कार्यभार अन्य अधिका-याकडे सोपविण्याची कार्यवाही सामान्य प्रशासन विभागाकडून (कार्यासन १०) केली जाईल. त्यानंतरच संबंधित अधिका-यांनी कार्यमुक्त होऊन प्रशिक्षणासाठी उपस्थित राहावे. तसेच प्रशिक्षण पूर्ण केल्यानंतर त्याबाबतची माहिती प्रशिक्षण पूर्ण केल्याच्या प्रमाणपत्रासह सामान्य प्रशासन विभागास (कार्यासन ९/९अ/१०) यांना पाठवावी.

सदर परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१८०८२७१५४९०६८३०७ असा आहे. सदर परिपत्रक डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

Sarita Rishi Bandekar Deshmukh

Digitally signed by Sarita Rishi Bandekar Deshmukh
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5140223e17381bc47a67b9fede8dda33c03e3e9ce591f826d8193080c68a08b8, serialNumber=e40a063b6b4e8f59f91f350aa6fec292a55db5bf8829c64d6c44e00a701cdaac, cn=Sarita Rishi Bandekar Deshmukh
Date: 2018.08.27 15:50:53 +05'30'

( स.रि.बांदेकर-देशमुख )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
२) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
३) मा.मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक
४) सर्व मंत्रालयीन विभागांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
५) महाराष्ट्र संवर्गातील सर्व भाप्रसे अधिकारी,
६) निवड नस्ती.